**उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला अंतर्गत जिल्हा आरोग्य अधिकारी, वाशिम अस्थायी पद पुढे चालू ठेवण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२४/ प्र.क्र.१७२/ आरोग्य-३**

गोकुलदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,१० वा मजला
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
तारीख: ०९ जुलै, २०२४

वाचा -

1) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक: अपदे-२०२३/प्र.क्र.१२५/आरोग्य-३, दिनांक- ०८.११.२०२३**
2) **सहसंचालक,आरोग्य सेवा (प्रा.आ.केंद्र/उपकेंद्र/दवाखाने), मुंबई यांचे पत्र क्र-आआसे/कक्ष-७अ/टे-६/जिआआ जिप वाशिम/पद पुढे चालू ठेवणेबाबत/सन २०२४-२५/२४२३-२४/२०२४, दिनांक- २४.०६.२०२४.**
3) **वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क, दि.२१.०२.२०२४.**

**शासन निर्णय-**

उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला अंतर्गत जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम या अस्थायी पदास उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२३ ते २९.०२.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम या अस्थायी पदास दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०२४-२०२५ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक-आर-१

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६ - सार्वजनिक आरोग्य सेवा
००१ - संचालन व प्रशासन
००१ (३) - जिल्हा आरोग्य अधिकारी (२२१० ०३६२)

४. हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. २१.०२.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. २१.०२.२०२४ अन्वये दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत अस्थाई पदांना मुदतवाढीस मान्यता देण्यात आली असली तरी, दरम्यानच्या काळात सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत सर्व प्रशासकिय विभागांनी तातडीने प्रस्ताव सादर करण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे. तसेच संदर्भ क्र.०३ अन्वये वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार अस्थायी पदांना दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली असून त्यादरम्यान सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याकरीता सुधारीत आकृतीबंधाचे प्रस्ताव शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २९ जून,२०१७ नुसार तपासून व त्यानुसार कार्यवाही करुन तातडीने वित्त विभागास सादर करण्याकरीता आयुक्तालय कार्यालयाकडून उचित कार्यवाही करावी व त्याबाबातचा प्रस्ताव शासनास पाठवावा. तसेच यापुढे अस्थायी पदांना सुधारित आकृतीबंधात समावेश करण्याबाबतची कार्यवाही तातडीने करावयाची आहे. त्यामुळे अस्थायी पदांची मुदतवाढ ही शेवटची मुदतवाढ समजण्यात यावी व त्यानुसार आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी, याबाबतची कृपया नोंद घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७०८१३०५४०८४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY DATTARAM MAHADESHWAR

Digitally signed by SANJAY DATTARAM MAHADESHWAR
DN: cn=SANJAY DATTARAM MAHADESHWAR, o, ou, email=sanjay.mahadeshwar@nic.in, c=IN
Date: 2024.07.09 15:53:54 +05'30'

**(सं.द. महाडेश्वर)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.

४. सहसंचालक, आरोग्य सेवा(रुग्णालये), मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, वाशिम.
८. जिल्हा आरोग्य अधिकारी, वाशिम.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम.
१०.वित्त विभाग, (व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.
११.कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प,सा.आ.वि.मंत्रालय,मुंबई.
१२.निवडनस्ती (आरोग्य-३)